दुग्ध व्यवसाय विकास विभागांतर्गत असलेली सहकार विभागाची १८ अस्थायी पदे दि.१/३/२०२४ ते दि.३१/८/२०२४ पर्यत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याबाबत..........

**महाराष्ट्र शासन,**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. राजस-२०२४/प्र.क्र.५८/५ स**
मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १४ मार्च, २०२४.

**वाचा :-** १) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.राजस-१००८/प्र.क्र.५३८/५स, दि.५/५/२०११

२) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन निर्णय क्र.दुवियो २०१२/प्र.क्र.१०२/पदुम-९, दि.३०/८/२०१४

३) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन निर्णय क्र.दुविआ-१४२०/प्र.क्र.५१/पदुम-९, दि.६/१/२०२१

४) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.राजस-२०२३/प्र.क्र.६९/५स, दि.२७/९/२०२३

५) सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांचे पत्र क्र. कक्ष-१/आस्था/प्रशासन/दुग्ध/२०२४, दि.१८/१/२०२४

६) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१/२/२०२४

**प्रस्तावना :-**

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाच्या संदर्भाधीन क्र.२ येथील दि.३०/८/२०१४ च्या शासन निर्णयान्वये दुग्धविकास विभागाच्या सुधारीत आकृतीबंधास मान्यता देण्यात आली असून कृषि विभागाच्या शासन निर्णयानुसार दुग्धव्यवसाय विकास विभागांतर्गत सुधारीत आकृतीबंधात सहकार विभागाच्या ७३ पदांचा समावेश करण्यात आला आहे. तदनंतर कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील दि.६/१/२०२१ च्या शासन निर्णयान्वये ७३ अस्थायी पदांपैकी ५५ पदांना स्थायी म्हणून मान्यता मिळालेली आहे. सदरची ५५ पदे वगळून उर्वरित १८ अस्थायी पदांना संदर्भाधीन क्र.४ येथील दि.२७/९/२०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार दि.२९/२/२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली होती. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या संदर्भाधीन क्र.५ येथील दि.१८/१/२०२४ रोजीच्या पत्रान्वये सदर पदांना दि.१/३/२०२४ ते दि.२८/२/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याची विनंती करण्यात आली आहे. त्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

प्रशासकीय कारणास्तव उपरोक्त अस्थायी पदे पुढे चालू ठेवणे आवश्यक असून त्यांना सन २०२४-२०२५ करीता मुदतवाढ मिळणे आवश्यक आहे. सबब, सदर १८ अस्थायी पदांना दि.१/३/२०२४ ते दि.३१/८/२०२४ पर्यंत चालू ठेवण्यास शासन मान्यता देत आहे. सदर १८ अस्थायी पदांचे कार्यालय निहाय विवरणपत्र प्रपत्र “अ” “ब” व “क” प्रमाणे सोबत जोडण्यात आले आहे.

२. याकरीता येणारा खर्च कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विकास विभागाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय दि.२१/२/२०२४ अन्वये विभागास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्या संगणक सांकेतांक २०२४०३१४१२१५०१४८०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL JAYRAM CHAUDHRY

Digitally signed by ANIL JAYRAM CHAUDHRY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D124AE9BBD15BED87DBD08EF779CF1B85A4020339EB1C2EF0E112FB67063011C, cn=ANIL JAYRAM CHAUDHRY
Date: 2024.03.14 12:24:05 +05'30'

(अनिल चौधरी)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग, वरळी, मुंबई.
३. प्रादेशिक दुग्धविकास अधिकारी, नाशिक/औरंगाबाद.
४. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन), (दुग्ध).
५. सर्व जिल्हा दुग्ध विकास अधिकारी.
६. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११. वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१९/ वित्तीय सुधारणा)
१२. कार्यासन अधिकारी, १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
१३. निवडनस्ती-कार्यासन ५स

सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र.राजस-२०२४/प्र.क्र.५८/५ स, दि. १३ मार्च, २०२४ चे सहपत्र

**प्रपत्र-अ**

उपनिबंधक संवर्गातील पदांची यादी

| **अ.क्र.** | **पद** | **संख्या** |
|---|---|---|
| १ | विभागीय उपनिबंधक (दुग्ध), नाशिक | १ |
| २ | विभागीय उपनिबंधक (दुग्ध), अमरावती | १ |
| | **एकूण** | **२** |

सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र.राजस-२०२४/प्र.क्र.५८/५ स, दि. १३ मार्च, २०२४ चे सहपत्र

**प्रपत्र-ब**

सहाय्यक निबंधक (दुग्ध) संवर्गातील पदांची यादी

| अ.क्र. | पद | संख्या |
|---|---|---|
| १ | सहाय्यक उपनिबंधक (दुग्ध), ठाणे | १ |
| २ | सहाय्यक उपनिबंधक (दुग्ध), रायगड | १ |
| ३ | सहाय्यक उपनिबंधक (दुग्ध),सोलापूर | १ |
| ४ | सहाय्यक उपनिबंधक (दुग्ध), जळगांव | १ |
| ५ | सहाय्यक उपनिबंधक (दुग्ध), लातूर | १ |
| ६ | सहाय्यक उपनिबंधक (दुग्ध), उस्मानाबाद | १ |
| ७ | सहाय्यक उपनिबंधक (दुग्ध), अकोला | १ |
| ८ | सहाय्यक उपनिबंधक (दुग्ध), बुलढाणा | १ |
| ९ | सहाय्यक उपनिबंधक (दुग्ध), यवतमाळ | १ |
| १० | सहाय्यक उपनिबंधक (दुग्ध), वर्धा | १ |
| | **एकूण** | **१०** |

सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र.राजस-२०२४/प्र.क्र.५८/५ स, दि. १३ मार्च, २०२४ चे सहपत्र

**प्रपत्र-क**

सहकार अधिकारी श्रेणी-१ व श्रेणी-२ संवर्गातील पदांची यादी

| अ.क्र. | पद | सहकार अधिकारी श्रेणी-१ | सहकार अधिकारी श्रेणी-२ |
|---|---|---|---|
| १ | ठाणे (कोकण विभाग) | -- | १ |
| २ | पुणे (पुणे विभाग) | -- | १ |
| ३ | अहमदनगर (नाशिक विभाग) | -- | १ |
| ४ | उस्मानाबाद (लातूर विभाग) | १ | १ |
| ५ | भंडारा (नागपूर विभाग) | -- | १ |
| | **एकूण** | **१** | **५** |